आदिवासी क्षेत्र उपयोजना/आदिवासी क्षेत्राबाहेरील उपयोज
२०१०-२०११ चे जिल्हानिहाय व योजनानिहाय अर्थसंकल्पीय
तरतुदीचे वाटप " **जलसंपदा** "

**महाराष्ट्र शासन**
**आदिवासी विकास विभाग**
**शासन निर्णय क्र.बीयुडी-२०१०/प्र.क्र.२२/का.६**
**मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२.**
**दिनांक :- १९ जून, २०१०**

**वाचा :** १)शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र.अंदाज-२०.१०/सीआर ६५/२०१०/अर्थसंकल्प-३, दिनांक ३ एप्रिल, २०१०
२) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र.अंदाज-२०१०/प्र.क्र. ७१/२०१०/अर्थसकल्प-३,दिनांक १८ मे, २०१०
३) शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग क्रमांक टिएसपी-२००८/प्र.क्र.६/का.६, दिनांक १६.१२.२०१०.

**शासन निर्णय :-** आदिवासी उपयोजनांतर्गत " **जलसंपदा**" या उपशिर्षाखाली २०१०-११ च्या अर्थसंकल्पीय अंदाजात समाविष्ट करण्यात आलेल्या तरतुदीचे व योजनांचे जिल्हावार वाटप आणि प्रत्येक योजनांचे अंमलबजावणी अधिकारी सोबत जोडलेल्या विवरणपत्रात दर्शविले आहेत.

२. आदिवासी क्षेत्र उपयोजनेखालील " **जलसंपदा** " या उपशिर्षाखालील योजनांना सोबतच्या विवरण पत्रातील स्तंभ क्र.२ मध्ये दर्शविलेल्या तरतुदी वितरणास मंजूरी देण्यात येत आहे. तसेच ती रक्कम स्तंभ क्रमांक ३ मध्ये दर्शविलेल्या अंमजबजावणी अधिका-यांच्या अधिनस्त ठेवण्यास मंजूरी देत आहे.

३. नियंत्रण अधिकारी आणि विभागप्रमुख यांनी ही तरतुद शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग क्र.टिएसपी-१०८६/८७१०/प्र.क्र.३१/का.५ दिनांक ९.३.१९९० अन्वये निश्चित केलेल्या आदिवासी उपयोजना क्षेत्रातील व क्षेत्राबाहेरील मान्य योजनांवर खर्च होतील याची दक्षता घ्यावी. तसेच या तरतूदी खर्च करतांना शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग, क्र.टिएसपी-२००३/प्र.क्र.१०१/का-६, दिनांक २६ जुलै, २००४ व टिएसपी-२००५/प्र.क्र.५९/का-६, दिनांक १० नोव्हेंबर, २००५ मधील अटींचे कटाक्षाने पालन करण्याची दक्षता घेण्यात यावी. तसेच प्रस्तुत शासन निर्णयाद्वारे वितरित करण्यात येत असलेल्या तरतूदी मासिक खर्च विवरणपत्राप्रमाणे खर्च करण्याची दक्षता सर्व नियंत्रक अधिका-यांनी घ्यावी.

४. विभागाच्या दिंनाक १६ डिसेंबर, २००९ च्या शासन निर्णयाव्दारे जिल्हास्तरीय योजना जिल्हाधिकारी यांच्याकडे राबविण्यासाठी देण्यात आल्या आहेत. जिल्हा योजनांसाठी प्रशासकीय मान्यता देण्याचे अधिकार जिल्हाधिकारी यांना देण्यात आलेले असल्यामुळे योजनेसाठी केलेली तरतूद त्याच योजनेवर त्याच जिल्ह्यात खर्च करणे बंधनकारक राहिल. त्यानुसार जिल्हा योजनेसाठी केलेली तरतूद जिल्हाधिकारी यांच्याकडे सुपूर्द करण्यात आली आहे. तथापि, हाती घेण्यात येणा-या कामांची निवड व त्यांचा वरीयता क्रम संबंधित विभागातील जिल्हास्तरीय क्षेत्रिय अधिकारी यांनी जिल्हाधिकारी, आयुक्त,आदिवासी विकास, नाशिक, संबंधित अपर आयुक्त व प्रकल्प अधिकारी यांचेशी चर्चा करुन निश्चित करावी. तसेच जिहास्तरीय योजनेतील कामांची तपासणी करण्याचे अधिकार व जबाबदारी संबंधित जिल्हाधिकारी तसेच प्रकल्प अधिकारी, अपर आयुक्त आदिवासी विकास यांची संयुक्तीकरित्या राहिल.

५. आदिवासी उपयोजनेंतर्गत उपलब्ध करुन दिलेली तरतूद फक्त आदिवासी लोकांकरिता वा आदिवासी उपयोजना क्षेत्रांतर्गत खर्च करण्यात यावी. तसेच आदिवासी क्षेत्राबाहेरील क्षेत्रासाठी केलेली तरतूद त्या क्षेत्रातील आदिवासी लोकांकरिता खर्च करण्यात यावी. आदिवासी उपयोजनेंतर्गत केलेली तरतूद आदिवासी उपयोजना क्षेत्राबाहेर किंवा सर्वसाधारण योजनेखाली खर्च करण्यात येवू नये. जर आदिवासी उपयोजनेत केलेली तरतूद खर्च झाली नाही तर सदर तरतूद प्रत्यार्पित करावी व कोणत्याही परिस्थितीत आदिवासी क्षेत्राबाहेर खर्च करण्यात येवू नये.

६ आदिवासी उपयोजनेची तरतूद आदिवासी क्षेत्राबाहेर खर्च झालेली आढळल्यास याबाबत विभागातील क्षेत्रिय अधिकारी आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक, संबंधित अपर आयुक्त, आदिवासी विकास, संबंधित जिल्हाधिकारी व प्रकल्प अधिकारी यांना जबाबदार धरण्यात येईल. तसेच आदिवासी उपयोजनेंतर्गत जिल्हा योजनांसाठी उपलब्ध करुन दिलेल्या तरतूदीतून झालेल्या खर्चाचा अहवाल लेखाशिर्षनिहाय/उप लेखाशिर्षनिहाय तसेच साध्य झालेले भौतिक

उद्दिष्टनिहाय माहिती जिल्हाधिकारी तसेच प्रकल्प अधिकारी यांनी आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक, संबंधित अपर आयुक्त, आदिवासी विकास व आदिवासी विकास विभागास प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत न चुकता पाठवावी.

७. नियंत्रण अधिकारी व विभाग प्रमुख यांनी आदिवासी उपयोजना क्षेत्रात अतिरिक्त आदिवासी उपयोजना क्षेत्रात तसेच आदिवासी उपयोजने क्षेत्राबाहेरील योजनांवर केलेला खर्च स्वतंत्रपणे नोंदविला जाईल याची दक्षता घ्यावी. जेणेकरुन शासनाला आदिवासी क्षेत्रातील व उपयोजने क्षेत्राबाहेरील योजनांवर होणा-या खर्चावर लक्ष ठेवता येईल व तो केंद्रशासनाला कळविता येईल.

८. नियंत्रण अधिकारी/विभाग प्रमुख यांनी नियम प्रचलित कार्यपध्दती व सध्याच्या शासकीय धोरणास अनुसरुन चालू योजनांवर खर्च करावा. हे आदेश फक्त अंमलबजावणी /नियंत्रक अधिका-यांच्या अधिनस्त ठेवलेल्या तरतुदीस प्रशासकीय दृष्टया मान्य केलेल्या चालू योजनांवर खर्च करण्यासाठी आहे. याची अंमलबजावणी अधिका-यांनी नोंद घ्यावी.

९. **आदिवासी उपयोजनेअंतर्गत आदिवासी क्षेत्र उपयोजना (टिएसपी) व आदिवासी क्षेत्राबाहेरील उपयोजना (ओटिएसपी) यांचा खर्च स्वतंत्रपणे नोंदविण्यासाठी लेखाशिर्षामध्ये काही बदल करण्यात आले असल्यास हे बदल लक्षात घेवून खर्च नोंदविताना सुधारित लेखाशिर्ष नोंदविण्याची दक्षता सर्व संबंधितांनी घ्यावी.**

**१०.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करुन देण्यात आला असून, त्याचा संगणक सांकेतांक **२०१००६१९११४५७४८००१** असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

(स्वाक्षरी) १८/६/१०

**( श. र. सावंत )**
**कार्यासन अधिकारी**

**प्रति,**

आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक. ( ५ प्रती )
अपर आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक/नागपूर/ठाणे/अमरावती.
विभागीय आयुक्त,मुंबई/पुणे/नागपूर/औरंगाबाद/नाशिक/अमरावती.
जिल्हाधिकारी व सदस्य सचिव, जिल्हा नियोजन व विकास मंडळ , नाशिक /गडचिरोली /अमरावती /नंदुरबार
मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद , नाशिक /गडचिरोली /अमरावती /नंदुरबार
सर्व प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प.
आयुक्त , आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे.
महालेखापाल (लेखापरिक्षा)/(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर
जिल्हा कोषागार अधिकारी, नाशिक /गडचिरोली /अमरावती /नंदुरबार
मुख्य लेखा व वित्तीय अधिकारी, जिल्हा परिषद , नाशिक /गडचिरोली /अमरावती /नंदुरबार
वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
पाटबंधारे विभाग (बजेट-२/लेखाशाखा), मंत्रालय, मुंबई - ३२
अधिक्षक अभियंता तथा संचालक, पाटबंधारे संशोधन व विकास, पुणे
कार्यकारी अभियंता, तापी पाटबंधारे विकास महामंडळ, औरंगाबाद.
कार्यकारी अभियंता, गोदावरी पाटबंधारे विकास महामंडळ, औरंगाबाद.
कार्यकारी अभियंता, विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळ, नागपूर.
मुख्य अभियंता, प्रादेशिक विभाग, लघुपाटबंधारे (स्थानिक स्तर), पुणे
प्रादेशिक मुख्य अभियंता, पाटबंधारे मंडळ, मुंबई/पुणे/नागपूर/अहमदनगर
संचालक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, महाराष्ट्र राज्य, पुणे (२ प्रती)
कार्यासन अधिकारी ( का.क्र. २, ६, ५, १४ ) आदिवासी विकास विभाग, मंत्रालय.
निवड नस्ती (का-६), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय,मुंबई.

## आदिवासी क्षेत्र उपयोजना २०१०-११ चे जिल्हानिहाय अंदाजपत्रकीय तरतूदीचे वाटप

(रुपये हजारात)

| शिर्ष : लघुपाटबंधारे<br>योजनेचे नांव : लघुपाटबंधारे कामाचे अन्वेषण व सर्वेक्षण | | मागणी क्रमांक टी-५<br>मुख्य लेखाशिर्ष : २७०२-लघुपाटबंधारे-पंचवार्षिक योजनांतर्गत योजना-०१-भुपृष्ठ जल-७९६-जनजाती क्षेत्र उपयोजना (०१) जनजाती क्षेत्र उपयोजनांतर्गत योजना-राज्य योजनांतर्गत योजना (०१) (०१) इतर लहान पाटबंधा-यांची कामे (राज्यक्षेत्र) सर्वेक्षणाचे कामे (२७०२ ३६८७) ३१-सहाय्यक अनुदाने (वेतनेतर) | | |
|---|---|---|---|---|
| जिल्हयाचे नांव | २०१०-११ साठी केलेली तरतूद | अर्थसंकल्पीय तरतूद सुपूर्द करण्यात आलेला नियंत्रण अधिकारी | प्रशासकीय विभाग | शेरा |
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| नाशिक | २०३६४ | संबंधित जिल्हाधिकारी | जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई | |
| गडचिरोली | ४५४ | | | |
| **एकूण-** | **२०८१८** | | | |

टीप : बांधकामावरील टक्केवारी खर्च वगळण्यात आला आहे

## आदिवासी क्षेत्र उपयोजना २०१०-११ चे जिल्हानिहाय अंदाजपत्रकीय तरतूदीचे वाटप

(रुपये हजारात)

| शिर्ष : लघुपाटबंधारे<br>योजनेचे नांव : विस्तार व सुधारणा. | | मागणी क्रमांक टी-५<br>मुख्य लेखाशिर्ष : २७०२-लघुपाटबंधारे-पंचवार्षिक योजनांतर्गत योजना-०१-भुपृष्ठ जल-७९६-जनजाती क्षेत्र उपयोजना (०१) जनजाती क्षेत्र उपयोजनांतर्गत योजना-राज्य योजनांतर्गत योजना (०१) (०२) स्वेच्छाधीन अनुदाने (विस्तार व सुधारणा)<br>(२७०२ ३६९६) ३१-सहाय्यक अनुदाने (वेतनेतर) | | |
|---|---|---|---|---|
| जिल्हयाचे नांव | २०१०-११ साठी केलेली तरतूद | अर्थसंकल्पीय तरतूद सुपूर्द करण्यात आलेला नियंत्रण अधिकारी | प्रशासकीय विभाग | शेरा |
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| अमरावती | २७२७ | संबंधित जिल्हाधिकारी | जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई. | |
| **एकूण-** | **२७२७** | | | |

टीप : बांधकामावरील टक्केवारी खर्च वगळण्यात आला आहे

### आदिवासी क्षेत्र उपयोजना २०१०-११ चे जिल्हानिहाय अंदाजपत्रकीय तरतूदीचे वाटप

(रुपये हजारात)

<table>
<tr><td colspan="2">शिर्ष : लघुपाटबंधारे<br>योजनेचे नांव : लघुपाटबंधारे योजना<br>(तापी पाटबंधारे महामंडळाअंतर्गत येणा-या प्रकल्पांना निधी उपलब्ध करुन देणे)</td><td colspan="3">मागणी क्रमांक टी-६<br>मुख्य लेखाशिर्ष: ४७०२-लहान पाटबंधारे भांडवली खर्च-पंचवार्षिक योजनांतर्गत योजना-८०-सर्वसाधारण -७९६, जनजाती क्षेत्र उपयोजना (०१) जनजाती क्षेत्र उपयोजनांतर्गत योजना-राज्य योजनांतर्गत योजना (०१) (०१) तापी पाटबंधारे विकास महामंडळाला भाग भांडवली अंशदान (४७०२ ४९७२) ३२-अंशदाने</td></tr>
<tr><td>जिल्हयाचे व प्रकल्पांचे नांव</td><td>२०१०-११ साठी केलेली तरतूद</td><td>अर्थसंकल्पीय तरतूद सुपूर्द करण्यात आलेला नियंत्रण अधिकारी</td><td>प्रशासकीय विभाग</td><td>शेरा</td></tr>
<tr><td>१</td><td>२</td><td>३</td><td>४</td><td>५</td></tr>
<tr><td>नंदुरबार</td><td>१७७००</td><td rowspan="2">संबंधित जिल्हाधिकारी</td><td rowspan="2">पाटबंधारे विभाग, मंत्रालय, मुंबई</td><td rowspan="2"></td></tr>
<tr><td>एकूण</td><td>१७७००</td></tr>
</table>

### आदिवासी क्षेत्र उपयोजना २०१०-११ चे जिल्हानिहाय अंदाजपत्रकीय तरतूदीचे वाटप

(रुपये हजारात)

<table>
<tr><td colspan="2">शिर्ष : लघुपाटबंधारे<br>योजनेचे नांव : लघुपाटबंधारे योजना<br>(कोकण पाटबंधारे विकास महामंडळाअंतर्गत येणा-या प्रकल्पांना निधी उपलब्ध करुन देणे)</td><td colspan="3">मागणी क्रमांक टी-६<br>मुख्य लेखाशिर्ष: ४७०२-लहान पाटबंधारे भांडवली खर्च-पंचवार्षिक योजनांतर्गत योजना-८०-सर्वसाधारण -७९६, जनजाती क्षेत्र उपयोजना (०१) जनजाती क्षेत्र उपयोजनांतर्गत योजना-राज्य योजनांतर्गत योजना (०१) (०२) कोकण पाटबंधारे विकास महामंडळाला भाग भांडवली अंशदान<br>(४७०२ ४९८१ ) ३२-अंशदाने</td></tr>
<tr><td>जिल्हयाचे व प्रकल्पांचे नांव</td><td>२०१०-११ साठी केलेली तरतूद</td><td>अर्थसंकल्पीय तरतूद सुपूर्द करण्यात आलेला नियंत्रण अधिकारी</td><td>प्रशासकीय विभाग</td><td>शेरा</td></tr>
<tr><td>१</td><td>२</td><td>३</td><td>४</td><td>५</td></tr>
<tr><td>नाशिक</td><td>१५०००</td><td rowspan="2">संबंधित जिल्हाधिकारी</td><td rowspan="2">जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई</td><td rowspan="2"></td></tr>
<tr><td>एकूण-</td><td>१५०००</td></tr>
</table>

### आदिवासी क्षेत्र उपयोजना २०१०-११ चे जिल्हानिहाय अंदाजपत्रकीय तरतूदीचे वाटप

(रुपये हजारात)

| शिर्ष : लघुपाटबंधारे<br>योजनेचे नांव : लघुपाटबंधारे योजना (विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळाअंतर्गत येणा-या प्रकल्पांना निधी उपलब्ध करुन देणे) | | मागणी क्रमांक टी-६<br>मुख्य लेखाशिर्षः ४७०२-लहान पाटबंधारे भांडवली खर्च-पंचवार्षिक योजनांतर्गत योजना-८०-सर्ववसाधारण -७९६, जनजाती क्षेत्र उपयोजना (०१) जनजाती क्षेत्र उपयोजनांतर्गत योजना-राज्य योजनांतर्गत योजना (०१) (०५) विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळाला भाग भांडवली अंशदान<br>(४७०२ ५१४६) ३२-अंशदाने | | |
|---|---|---|---|---|
| जिल्हयाचे व प्रकल्पांचे नांव | २०१०-११ साठी केलेली तरतूद | अर्थसंकल्पीय तरतूद सुपूर्द करण्यात आलेला नियंत्रण अधिकारी | प्रशासकीय विभाग | शेरा |
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| अमरावती | १२४३४ | संबंधित जिल्हाधिकारी | पाटबंधारे विभाग, मंत्रालय, मुंबई | |
| गडचिरोली | ६०० | | | |
| **एकूण** | **१३०३४** | | | |

### आदिवासी क्षेत्र उपयोजना २०१०-११ चे जिल्हानिहाय अंदाजपत्रकीय तरतूदीचे वाटप

(रुपये हजारात)

| शिर्ष : लघुपाटबंधारे<br>योजनेचे नांव : कोल्हापूर पध्दतीचे बंधारे (विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळाअंतर्गत येणा-या प्रकल्पांना निधी उपलब्ध करुन देणे) | | मागणी क्रमांक टी-६<br>मुख्य लेखाशिर्षः ४७०२-लहान पाटबंधारे भांडवली खर्च-पंचवार्षिक योजनांतर्गत योजना-८०-सर्ववसाधारण -७९६, जनजाती क्षेत्र उपयोजना (०१) जनजाती क्षेत्र उपयोजनांतर्गत योजना-राज्य योजनांतर्गत योजना (०१) (०५) विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळाला भाग भांडवली अंशदान<br>(४७०२ ५१४६) ३२-अंशदाने | | |
|---|---|---|---|---|
| जिल्हयाचे व प्रकल्पांचे नांव | २०१०-११ साठी केलेली तरतूद | अर्थसंकल्पीय तरतूद सुपूर्द करण्यात आलेला नियंत्रण अधिकारी | प्रशासकीय विभाग | शेरा |
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| गडचिरोली | ४००० | संबंधित जिल्हाधिकारी | पाटबंधारे विभाग, मंत्रालय, मुंबई | |
| **एकूण** | **४०००** | | | |